मौजे पनवेल, जि. रायगड येथील सर्वे क्र.४६७/२ मधील २ एकर ५ गुंठे जमिन मे.बी.पी.मरीन ॲकडमी यांना ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने देण्यास मंजूरी देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक:इपीटी १०/२०००/प्र.क्र.३४/बंदरे-२,
मंत्रालय, मुंबई-३२. दिनांक : ३१ मार्च, २००४.

शासन निर्णय :- महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने मौजे पनवेल, जि. रायगड येथील सर्वे क्र.४६७/२ मधील २एकर ५ गुंठे जमिन सागरी प्रशिक्षणासाठी मे. बी.पी. मरीन ॲकडमीस १५ वर्षाच्या भाडेपट्टयाने देण्याबाबत दि.३०.३.९९ रोजी करारनामा केला होता. तथापि सदर बी.पी.मरीन ॲकडमीस ६० वर्षाच्या भाडेपट्टयाने देण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने शासनास पाठविला होता. तो प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता महसूल व वन विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५०५, दि.१२.६.२००३ अन्वये दिलेल्या मंजूरी नंतर ती जमिन मे.बी.पी.मरीन ॲकडमीस ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने देण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासन मंजूरी देत आहे.

अटी व शर्ती :- (१) सदर जमिन शासकीय जमीन म्हणून भाडेपट्टयाने मरीन ॲकडमीस देण्यास महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ मधील सरकारी जमीनीची विल्हेवाट नियमातील नियम ३५ मधील अटी व शर्तीवर देण्यास शासन मंजूरी देत आहे. तसेच या संदर्भातील महसूल व वन विभागाचा शा.नि.क्र.एलआरएफ १०९२/प्र.क्र.८७/ज-१, दि.३०.६.१९९२ मधील परिच्छेद क्र. २(ब) नुसार भाडेपट्टयाचा दर जमीनीची प्रचलीत बाजारमूल्य विचारात घेता विनाअट त्यावर आकारण्यात येणा-या स्टेट बँकेच्या प्राईम लेडींग रेट इतका असावा.

(२) भाडेपट्टा कालावधी ३० वर्षाचा असून दर १० वर्षानी भाडेपट्टयाच्या दरात सुधारणा करण्यात यावी.

(३) भाडेपट्टेधारक हा भोगवट दार वर्ग-२ म्हणून राहील.

(४) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने विहित नमुन्यात भाडेपट्टा करारनामा मरीन ॲकडमीकडून करुन घ्यावा.

(५) तीस वर्षाचा कालावधी संपल्यानंतर शासन ही जमीन परत घेईल. त्याबाबत कोणताही मोबदला मरीन ॲकडमीस मिळणार नाही.

(६) ज्या प्रयोजनासाठी जमीन मंजूर केली आहे त्याच प्रयोजनासाठी जमीनीचा वापर कंपनीने करावा.

(७) सदर जमीनीवर कोणत्या प्रकारचे स्थायी/अस्थायी बांधकाम अनुज्ञेय असणार नाही.

(८) भविष्यात प्रस्तुत जमिनीची शासनास आवश्यकता भासल्यास सदर जमीन भाडेपट्टीधारक तात्काळ आणि कोणताही मोबदला न घेता शासनास परत करतील.

(९) इतर अटी व शर्ती वेळोवेळी शासनाकडून लादल्या जातील त्याचे पालन करणे कंपनीवर बंधनकारक राहील. या अटीचा भंग झाल्यास सदर जमीन शासन पूर्वसूचना न देता ताब्यात घेईल.

(१०) मरीन ॲकडमीस सदर जमिनीची विक्री अथवा कोणासही गहाण देता येणार नाही.

ही जमीन पनवेल बंदरालगत असल्याने सी.आर.झेड. च्या तरतुदी विचारात घेऊन पर्यावरण विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे ॲकडमीस बंधनकारक आहे. उपरोक्त सर्व अटींच्या अधिन राहून त्याचप्रमाणे नियमित अटी व शर्ती बरोबर मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना योग्य वाटतील अशा अन्य अटीसह शासन मौजे पनवेल, जि. रायगड येथील सर्व्हे क्र.४६७/२ मधील २ एकर ५ गुंठे जमीन मे.बी.पी.मरीन ॲकडमी यांना ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने देण्यास शासन मंजूरी देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(कृ. श्री. भाकरे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत,

जिल्हाधिकारी, रायगड.
महालेखापाल, महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
मुख्य बंदर अधिकारी,महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
मा. मंत्री, महसूल यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, महसुल यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव (महसुल) यांचे स्वीय सहाय्यक.
मा. मंत्री, बंदरे यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, बंदरे यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव, बंदरे यांचे स्वीय सहाय्यक.

----------